जाहिरात व प्रसिध्दी या योजनेअंतर्गत निधी
वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हातमाग २०१५/प्र.क्र.७५/टेक्स-३**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : ४ नोव्हेंबर, २०१५.

वाचा -

१) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय यांचा प्रस्ताव दिनांक १९.९.२०१५
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३,दि. १७.४.२०१५
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३,
दिनांक ३०.६.२०१५४)
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१५/प्र.क्र.३४/कोषा-प्रशा५,
दिनांक २४.७.२०१५

प्रस्तावना -

संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांच्या उपरोक्त संदर्भांकित प्राप्त प्रस्तावान्वये, हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर सहाय्य या योजनेअंतर्गत महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ (महाटेक्स) मर्या, मुंबई या कार्यालयांना जाहिरात व प्रसिध्दीकरीता रु. २२.०० लक्ष इतका निधी सन २०१५-१६ च्या मंजूर निधीतून वितरीत करण्याची करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ (महाटेक्स) मर्या, मुंबई या कार्यालयांना जाहिरात व प्रसिध्दीकरीता रु. २२.०० लक्ष इतका निधी सन २०१५-१६ च्या मंजूर निधीतून वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ (महाटेक्स) मर्या, मुंबई यांना सन २०१५-१६ मध्ये प्रत्येकी १ स्पेशल हॅन्डलूम प्रदर्शन व प्रत्येकी ५ जिल्हास्तरीय प्रदर्शने आयोजित करण्यास केंद्र शासनाने मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे.

**महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, नागपूर**

| अ.क्र. | प्रदर्शनाचे नावे | प्रदर्शनांची संख्या | अर्थसहाय्य रु. (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | स्पेशल हॅन्डलूम एक्स्पो - | १ ( प्रत्येकी २ लाख प्रमाणे ) | ०२ |
| २ | जिल्हास्तरीय प्रदर्शनी | ५ ( प्रत्येकी १ लाख प्रमाणे ) | ०५ |
| ३ | इतर राज्यात आयोजित राष्ट्रीय प्रदर्शनात भाग घेण्याकरीता | ५ ( प्रत्येकी १ लाख प्रमाणे ) | ०५ |
| | एकूण | | १२ |

**महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई**

| अ.क्र. | प्रदर्शनाचे नावे | प्रदर्शनांची संख्या | अर्थसहाय्य रु. (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | स्पेशल हॅन्डलूम एक्स्पो - | १ ( प्रत्येकी २ लाख प्रमाणे ) | ०२ |
| २ | जिल्हास्तरीय प्रदर्शनी | ५ ( प्रत्येकी १ लाख प्रमाणे ) | ०५ |
| ३ | इतर राज्यात आयोजित राष्ट्रीय प्रदर्शनात भाग घेण्याकरीता | ३ ( महाटेक्सच्या मागणीनुसार ) | ०३ |
| | एकूण | | १० |

३. सदर आदेश वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर सहाय्य या योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करीता रु. १५०.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

५. सदर योजनेअंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रु. २२.०० लाख निधी, जाहिरात व प्रसिध्दीचा कार्यक्रम राबविण्यासाठी सहायक संचालक (लेखा), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र शासन, नागपूर यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम ज्या उद्देश्यासाठी अदा करण्यात येत आहे, त्याच उद्देश्यासाठी वापरण्यात यावी.

६. यासाठी होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक व्ही-२
२८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग
११० संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था,
(०२) (५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य
(२८५१ ०११९ )
२६ जाहिरात व प्रसिध्दी

७. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ (महाटेक्स) मर्या, मुंबई यांनी उपरोक्त रकमेचे विनियोग प्रमाणपत्र, संचालक वस्त्रोद्योग, यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

८. या योजनेअंतर्गत सन २०१५-१६ मध्ये मागील ३ महिन्यापूर्वी निधी वितरीत करण्यात आलेला नाही.

९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या.,नागपूर व व्यवस्थापकीय संचालक, महाटेक्स,मुंबई यांनी उपरोक्त रकमेच्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र, वस्त्रोद्योग

संचालनालय, नागपूर मार्फत शासनास सादर करावे. सदर रक्कम ज्या उद्देश्यासाठी अदा करण्यात येत आहे, त्याच उद्देश्यासाठी वापरण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०५१२४११३०७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anand Arjun Mali

Digitally signed by Anand Arjun Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anand Arjun Mali
Date: 2015.11.05 12:52:46 +05'30'

**( आ.अ.माळी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर
४. व्यवस्थापकीय संचालक, महाटेक्स, मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या. नागपूर
६. उप सचिव (वस्त्रोद्योग) टेक्स-३, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
७. कार्यासन अधिकारी, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-२, अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती टेक्स-३.